मौ. खानापूर ता. परंडा जि. जि.उस्मानाबाद या योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२०१४/प्र.क्र. १९८/पापु-१८.
नवीन प्रशासन भवन
मंत्रालय, मंबई ४०० ०३२
दिनांक:०३ डिसेंबर, २०१४.

वाचा

१. शासन निर्णय क्र.ग्रापापु ११०९/१०४ अ/पापु-०७ दि.१७.०३.२०१०.
२. शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१२१३/प्र.क्र.३५/पापु-०७ दि. १६ जुलै,२०१३.
३. शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७ दि. ९ ऑक्टोबर,२०१३.
४. शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७ दि. ९ जुलै,२०१४
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.उस्मानाबाद यांचे पत्र क्र.ग्रापापुवि/जिपउ/ २०३६/ २०१४ दिनांक ०१.०९.२०१४

प्रस्तावना :-

मौ. खानापूर ता. परंडा जि. उस्मानाबाद या पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास ग्रामपंचायत खानापूर यांनी ठराव क्र. ५ दिनांक ७.१२.२०१२ नुसार प्रस्तावित केला होती. योजनेचा दरडोई खर्च वाढल्यामुळे सदरचा प्रस्ताव उस्मानाबाद जिल्हा परिषदेने शासनाच्या मान्यतेकरीता सादर केलेला आहे. त्यानुसार वाढीव दरडोई खर्च असलेल्या यमगीरवाडी पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

मौ. खानापूर ता. परंडा जि. उस्मानाबाद या पाणी पुरवठा योजनेच्या रु. ३५५८.७६/- एवढया वाढीव दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रु. ४९,४६,६८२/- ( रु. एकोणपन्नास लाख शेचाळीस हजार सहाशे ब्याऐंशी फक्त) इतक्या ढोबळ किमंतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. मौ. खानापूर ता. परंडा जि. उस्मानाबाद या पाणी पुरवठा योजनेच्या वित्तीय आकृतीबंधातील शासकीय अनुदान तसेच लोकवर्गणी हिस्सा सदर्भाधीन शासन निर्णय क्र. ४ मध्ये नमुद केल्याप्रमाणे राहील.

३. सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) सदर योजनेची अंमलबजावणी ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांनी करावी योजना पुर्ण झाल्यानंतर ती यशस्वीरित्या पुर्ण झालेली आहे, याची खात्री ग्रामपंचायतीने करावयाची असून योजना पुर्ण होऊन चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती ग्रामपंचायत/ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती करेल.

२) योजना चालविण्यासाठी व देखभाल दुरुस्तीसाठी येणारा खर्च भागविण्याकरीता सबंधीत ग्रामपंचायतीने योग्य ती पाणीपट्टी निश्चित करावी. पाणी पट्टीचे दर रु.२६००/- प्रतिघरटी आकारावे व तसा ग्रामसभेचा ठराव प्राप्त करुन घ्यावा. व योजनेची देखभाल दुरुस्ती करावी त्यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

३) योजनेचे स्त्रोत बळकटीकरण करण्यात यावे, तसेच योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

४) संपूर्ण गाव हागणदारी मुक्त करण्यात यावे.

५) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

६) दरडोई खर्चाचे निकषात योजना नसल्यामुळे कोणत्याही परिस्थितीत योजनेचे काम मंजूर किमंतीतच पुर्ण करावे. त्यासाठी कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने कार्यवाही करावी.

७) ज्याप्रकरणी जलसंपदा विभागाची पाणी उचलण्याची परवानगी आवश्यक आहे, त्याप्रकरणी परवानगी/आरक्षण प्राप्त झाल्याशिवाय योजनेच काम सुरु करु नये. तसेच उदभवामधून आवश्यक पाणी उपलब्ध होईल याची खात्री केल्यावरच योजनेच्या निविदा बोलविण्यात याव्यात.

८) योजनेतील कामे टप्प्या-टप्प्याने करावीत. उदभव विकसीत झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत.

९) जास्त किमंतीच्या निविदा स्वीकृत करण्यापूर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी. त्यानंतरच योजनेची कामे सुरु करण्यात यावीत.

१०) योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील. याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे द्यावी, व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरुवात करावी.

११) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची तसेच दिनांक १७.३.२०१० व दि. ९.७.२०१४ च्या शासन निर्णयातील अटींची पुर्तता करण्यात यावी.

१२) जिल्हापरिषदेने देखभाल व दुरुस्तीचा खर्च कमी करण्यासाठी व पर्यायाने पाणीपट्टी कमी करण्यासाठी उपाय योजना कराव्या.

४. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणा-या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर वर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१४१२०३१७१४३५५१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHADGE RAMDAS M

Digitally signed by GHADGE RAMDAS M
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=Maharashtra, cn=GHADGE RAMDAS M
Date: 2014.12.03 17:22:23 +05'30'

**( रा. म. घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:**

१) मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.

२) मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई- ३२.

३) सर्व मा. विधानसभा/विधान परिषद सदस्य.
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग औरंगाबाद.
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६) जिल्हाधिकारी, उस्मानाबाद.
७) संचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. उस्मानाबद
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ना.व.ग्रा. योजना ठाणे.
११) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, उस्मानाबाद.
१२) अधीक्षक अभियंता, (भारत निर्माण कक्ष) विभागीय आयुक्त, कार्यालय, औरंगाबाद
१३) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ना.व.ग्रा.मंडळ, औरंगाबाद
१४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हापरिषद, उस्मानाबाद
१५) महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१६) महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१७) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय,मुंबई.
१८) मुख्य अभियंता तथा वि. का. अ., पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय मुंबई.
१९) पाणी पुरवठा विभाग सर्व कार्यासने
२०) निवडनस्ती पापु-१८.